**सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ पदावरील सरळ सेवेने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. उवतंशि/तांशि-१ /३३/१४/प्र.क्र.(१०३/१३)**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ /०१/२०१७

**पहा :-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५(२)(२११)/१८२३३/सात-अ, दिनांक ०२/०३/२०१६ चे पत्र .
२) सामान्य प्रशासन विभाग यांचे शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६ कार्य-१२, दि.८/०५/२०१५

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत एकूण १२ उमेदवारांपैकी खालील १० उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ क्र | उमेदवाराचे नाव | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्र | महसूल विभाग | पदस्थापनेचा तपशिल | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. थोरात संदिप आनंदराव | खुला-१ | ०१ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | ---- |
| २ | श्री. चेके शैलेश ज्ञानेश्वर | खुला-२ | ०२ | नाशिक | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | बुलढाणा येथील चारित्र्य पडताळणीच्या अधीन राहून |
| ३ | श्री. अंधारे चेतन विक्रम | खुला-३ | ०३ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | ---- |
| ४ | श्री. बागवडे रामदास पांडुरंग | इमाव | ०५ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | पुणे येथील चारित्र्य पडताळणीच्या अधीन राहून |
| ५ | श्री. शेंडे शैलेंद्र वासुदेव | अजा | ०६ | नाशिक | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | ---- |
| ६ | श्री. गवळी तुकाराम काशिनाथ | भज(ब) | ०७ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | ---- |
| ७ | श्रीमती नेमाडे संगिता बाळकृष्ण | इमाव (महिला) | ०८ | नाशिक | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | ---- |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | श्रीमती सहारे रेखा खुशालराव | अजा (महिला) | ०९ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | --- |
| ९ | श्रीमती शेटटी निकिता रविंद्र | खुला (महिला-१) | ११ | नाशिक | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगांव | --- |
| १० | श्रीमती शिंदे पुजा कालिदास | खुला (महिला-२) | १२ | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | --- |

०२. संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. उपरोक्त उमेदवारांपैकी अ.क्र. ०२ व ०४ येथील उमेदवारांचा चारित्र्य पडताळणी अहवाल अद्याप अप्राप्त आहे. त्यांची नियुक्ती सामान्य प्रशासन विभागाच्या क चापअ-१००८/प्रक्र२१४/०८/ १६ अ दि. ०९.०९.२००९ मधील तरतूदीनुसार चारित्र्य पडताळणी अहवालाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. त्यानुसार सदर उमेदवारांनी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ०६ महिन्यांच्या आत चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर न केल्यास त्यांची सदर पदावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल. उर्वरित उमेदवारांचा चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झालेला आहे.

०३. उपरोक्त उमेदवाराची, सहाय्यक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. १५,९००- ३९,१००/- या पे बँड आणि उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांस प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि. ७/८/२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. १९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत

मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) उपरोक्त उमेदवारांपैकी महाराष्ट्र शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांचे परिविक्षाधीन कालावधीतील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ नुसार निश्चित करावे.महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार त्यांना परिविक्षाधीन कालावधीत वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे नवीन पदावरील प्रारंभिक वेतन वित्त विभागाच्या क्र. वेतन १२८९/प्रक्र२/९०/सेवा -३, दि. १९.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार संस्था स्तरावर निश्चित करण्यात यावे.

८) सदर उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजू व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

१०) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

११) उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०४. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०५. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाने संचालकामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०६१२४७५२६५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shamkant B Parnaik

Digitally signed by Shamkant B Parnaik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shamkant B Parnaik
Date: 2017.01.06 12:50:55 +05'30'

**(शा.भा.पारनाईक)**
कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

सर्व संबंधित उमेदवार

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई .(पत्राव्दारे)
२. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर/जळगाव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-/२, मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर/जळगाव
८. निवड नस्ती (तांशि-१).